भी देखनेवाला सिरेके खातेको उस पेटेमें समझ जरूर लेता है. यह बात तब होसकती है जब कि पूरा खाता सामने मौजूद हो. जब पूरा खाता सामने न हो किंतु पेटेकी एक कलमकी रकम ही किसीको लिखकर बतानी हो तो वहां खातेका खुलासा नाम भी बताना पडता है इसी तरह जब तत्त्वार्थसार हमने पुरा लिखा था तब अंतरायका खाता सिरेपर बताकर पेटेकी कलममें विघ्न करनेरूप खातेका नाम पुनः न लिखकर फक्त यह लिख दिया था कि निर्माल्य ग्रहणसे अंतरायका बंध होता है. परंतु जब लेखमें खाता सामने नहीं था तब उस कारिकाका अर्थ बताते हुए खाता भी बतादिया कि निर्माल्य ग्रहणसे तभी अंतराय कर्म बंधेगा जब कि किसीको उससे विघ्न होना संभव हो.

पाठक विचार करें कि इस प्रकार हमारे दोनोंवारके लेखमें फर्क या विरोध क्या पडगया ? सेठजीको ऐसा अर्थका विपर्यास करना मुनासिब नहीं है.

दूसरी बात इस विषयमे यह कहनी है कि सेठजी जो हमको इस निर्माल्यके लेखके कारण कषाय पुष्ट किया बताते हैं सो ठीक नहीं है. अपने दोषको दूसरेपर डालना ठीक नहीं है. हम द्रव्य पूजाके समर्थक होनेसे थोडा तो भी द्रव्य पूजामें खर्च करेगे परंतु सेठजी निषेधक होनेसे अग्नि कुंडका उन्हें जन्मभरमें एक दो वार ही मौका मिला होगा इसलिये सेठजी बिलकुल ही सूखा नमस्कार करनेवालोंमेंसे एक हैं. इसलिये सरासर अपनेपरका मिथ्या आक्षेप हमारे उपर करनेका साहस सेठजी आयंदेसे न करें तो ठीक है.

---

# निर्माल्य विचार.

[ जैनसिद्धांत-श्रावणमास वीरसं. २४४७ आगष्ट १९२१ ]

हमने निर्माल्य द्रव्यका क्या किया जाय इस प्रश्नका उत्तर अपने-निर्माल्य विनियोग लेखमें किया था, उसपर सोलापूरके श्रीयुत सेठ हिराचंद नेमचंदजी कुछ आक्षेप करते हैं. हमारा अभिप्राय यह था कि देवस्थानोंमें जो लोग निरंतर काम करते हैं और उनकी आजीविकाका दूसरा कोई साधन नहीं है उन्हें निर्माल्य द्रव्यपर पेट भरके इस काममें लगे रहना चाहिये या नहीं; एवं, यदि वे उसमें लगे रहें और निर्माल्यपरसे पेट भरा तो उन्हें जैनधर्मी न कहकर पातकी कहना चाहिये या उस अवस्थामें वे जैनधर्मसेवी होसकते हैं ? यह एक प्रश्न हुआ.

दूसरा प्रश्न यह कि यदि निर्माल्यपर पेट भरनेवाला अधर्मी समझा जाता है ऐसा समझकर देवस्थानके कामको वे लोग छोड दें और दूसरा भी कोई इसी कारण वह काम न करे तो वह काम कैसे हो ? इसीसे लगता तिसरा प्रश्न यह है कि क्या उस कामको करनेवालेकी उपजीविका किसी दूसरी तरहसे निर्विघ्न सदा चल सकती है जिससे कि उस उपजीविकासे निराकुलताके साथ निर्वाह कर वह मनुष्य देवकार्यमें लगा रहे और काममें विघ्न न पडे ?

इन प्रश्नोंके उत्तरमें हमने अपने लेखमें यह बताया था कि निर्माल्य ग्रहण करनेसे वह पापी नहीं होजाता. पापीका अर्थ हिंसा, झूट, चोरी मैथुन व इतर वस्तुओंमें उत्कट लालसा रखना है. संक्षेपमें पाप समझना हो तो अन्यायका नाम पाप है. उसी अन्यायके झूट चोरी आदि पांच भेद हैं. निर्माल्य ग्रहण जो देवस्थानकी सेवाके बदले है वह अन्याय नहीं है. "धर्मो दयार्द्रचित्तत्वमन्यायः प्राणिमारणं" ऐसा

अन्यायका लक्षण भगवज्जिनसेनने बताया है; इसका भी यही तात्पर्य है. क्योंकि अन्यायसे दूसरेका अहित होता है. और अपनी निष्ठुर वृत्ति होनेसे अपना भी अहित होता है. यह धर्मशास्त्रकी अपेक्षा अर्थ है और व्यवहारकी अपेक्षासे राजनियमविरुद्धको अन्याय कहते हैं.

उक्त सेठजीने भी पांच पापोंका यह तात्पर्य बताया है कि सबसे बडे ये ही पाप हैं और इनके छोडनेसे मनुष्य किसी प्रकारके राजदंडमें भी फस नहीं सकता; इससे मालुम होता है. कि सेठजी भी मुख्य पाप पांच ही मानते हैं. अब सवाल यह होजाता है कि निर्माल्यग्रहणको यदि पाप मानें जैसा कि ग्रंथकारोंने बताया है तो उसे उक्त पांच पापोंमे गर्भित करलेना चाहिये या नहीं ? धर्मशास्त्रोंका उपदेश देखनेसे पता लगता है कि पांचके सिवा छट्ठा पाप कोई नहीं है; तो फिर इसे भी किसीमें गर्भित करना ही होगा. इसीलिये हमने अपने लेखमे बताया था कि राजवार्तिककारके कथनानुसार अंतराय—विघ्नका कारण होनेसे चोरीमें इसे गर्भित करना चाहिये. यदि यह विघ्न करनेका कारण है तो किसीका विघ्न हो तभी चोरीमें इसे सामिल किया जाय, नहीं तो नहीं. इसीसे नियोगी मनुष्य चोरीके दोषसे बच जाता है, यह हमने दिखाया था.

इस मार्मिक बातपर एक भी अक्षर न लिखकर इंदोरसे गोधाजी कोसने लगे और आपने स्वयं इसके विषयमें एक भी युक्ति न देकर केवल यह सर्टिफिकेट दे दिया कि ये इनकी कुयुक्ति हैं. गोधाजीको और सेठजीको मालुम होना चाहिये कि हमने जो चोरीमें गर्भित करते हुए नियोगीको उससे छुटादिया है वह विना आगमयुक्तिके कोसने और सर्टिफिकेट देनेसे खंडित नहीं हो जायगा. जिसमें हिंमत हो उन्हें चाहिये कि पांच पापोमेंसे किसीमें गर्भित करके दिखावें और हमारे समर्थनको प्रदोष ठहरावें ' उपाध्यायपुजारीनिवेद्याजिवेद्य ' लिखकर सेठजी विद्वानोंमें हसी कराते हैं और यह पता लगजाता है कि

सेठजीको शब्दोंका परस्पर कारकसंबंध बिलकुल मालूम नहीं है. क्या हमारे लेखका यह तात्पर्य है कि उपाध्यायको द्रव्य अर्पण किया जाता है?

जिसे हम कूडा समझते हैं वह त्यागयोग्य होजानेसे उसे दूसरा कोई लेले तो हमारी उसने कोई चोरी नहीं की, इसी प्रकार देवताको अर्पित द्रव्य बादमें देवकी अपेक्षासे कूडा है–त्याज्य है; इसलिये उस देवत्याज्यको जो अपने काममें लेलेता है. वह देवकी चोरी करनेवाला नहीं कहा जासकता ऐसी हालतमें उसे किसका विघ्न करनेवाला कहें इसका शेठजी और गोधाजी उत्तर दें. यह भी वे उत्तर दें कि विघ्न करनेका अर्थ न ठहरता हो तो भी क्या अंतरायका उसके ग्रहणसे बंध होगा ही? इसे जो अंतरायका कारण बताया है वह क्या विना ही हेतुके बताया है? क्या अंतरायका सामान्य लक्षण इसमें नहीं घटता? नहीं घटता तो क्यों 'विघ्नकरणमंतरायस्य' इसी सूत्रकी व्याख्यामें इसे लिखा है? विघ्न होता है तो किसका और कैसे? यह सब उत्तर देना सेठजीकी तर्फ है.

शेठजीने कुछ श्लोक इस बातके उद्धृत करके दिखाये हैं कि जुदे जुदे देव भगवानकी पूजा भक्तिके नियोगी हैं परंतु वे निर्माल्य ग्रहण नहीं करते. इसका उत्तर यह है कि विना भोजनकी फिक्र किये देव नियोगी होसकते हैं परंतु मनुष्य नहीं होसकते मनुष्य पेटका नियोग पेस्तर करता है. पीछे दूसरी बात यदि पेटकी चिंता किये विना भी मनुष्य इतर नियोगमें लग सकता होता तो असि मसि आदि नियत नियोग करनेकी जरूरत ही न पडती. मुनियों तकको दान लेनेकी जरूरत पडती है. कुछ लोग धर्मके लिये दान देते हैं और कुछ लोग लेनेके योग्य होते हैं; यह विधि मार्ग है और कर्तव्य धर्मका स्वरूप है. परंतु जिन्हें कोई पात्र भी मानता नहीं है और देवकी सेवा करना अपना कर्तव्य जिन्होंने वंशपरंपरासे समझही रक्खा है वे उस कर्तव्यसे

विमुख हो जाय यह अच्छा या निर्माल्यसे निर्वाह करके सेवामें लगे रहें यह अच्छा ?

हम समझते हैं कि निर्माल्यसे निर्वाह करके भी जो आनु- वंशिक धर्मको छोडते नहीं हैं यह अच्छा है आज गृहस्थ लोग कृपण होगये इसलिये उनको सत्कारके साथ देकर निर्वाह भी नहीं करानेकी फिकर करते हैं और उधर वे विचारे निर्माल्यपर निर्वाह करके भी सेवामें लगे रहे हैं, इस बातको उनकी निंदा करते हैं यह आपनेलिये भूषण नहीं है ये वे गृहस्थ हैं जि- नको कि भरत महाराजने धनधान्यसे पूजा कर इस धर्ममें दृढ किया था. आज हमारी यह कुतर्क और कृपणता उनको मदत तो दमडीकी नहीं हो करने देती परंतु यथातथा वे जन अपने नियोगमें लगरहे हैं उनको उनमें विमुख करडालनेका हम प्रयत्न करते हैं जहां ये लोग नहीं है ऐसे प्रांतोंमें पूजाका बारबार कैसा फजिहता होता है सो अनुभव करनेसेही मालूम होसकता है.

इस वक्त भावना चाहे जैसी हो परंतु वस्तुस्थिती ऐसी है कि ये लोग पूजा करें और अपन इनकी गृहस्थीका निर्वाह चलाने योग्य दान दें तथा घरद्वार कायम करते रहें. अपन इस बातको भूलगये भरतचक्रीने धर्मा त्मा समझ उनको धनधान्य नहीं दिया जो कि राजा महाराजा थे किंतु यज्ञ पूजामें जो लगे रहनेके कारण उदरनिर्वाहकी कुछ खटपट नहीं कर सकते थे उन्हें निर्वाहके योग्य सब कुछ दिया विचार करनेकी बात है कि जिनके हजारो वाहन हों ऐसे राजाओंको वाहन क्या दिये जांय गे और वेभी धर्मकी रक्षाके हेतु । इससे स्पष्ट होता है कि जो धर्ममें आसक्ति रहनेके कारण अपना निर्वाह स्वयं नहीं कर सकते थे उन्हींको भरतने सब कुछ दिया और प्रजासे दिलानेकी रिवाज डालदी आज उनके हम जैन कहानेवाले रहा ठहा भी छुडा लेना चाहते हैं. तभी तो धर्मकी यह दशा है !

जब वे लोग पूजा करनेके नियोगी हैं तो इस पूजाकी सामग्रीपर उनका हक भी सुतरां होजाता है कि वे चांहे सो उसका करें जब उन्हें श्रावक लोग पूजते थे तब वे इस सामग्रीका चांहे सो करते होंगे परंतु जब श्रावकोंसे निर्वाह न होसका तबसे वे उस सामग्रीको अपने काममें लाने लगे. कोई समय ऐसा भी बीता है जब कुछ श्रावकोंने उन्हें पूजना भी छोडदिया हो और सामग्री स्वयं लेना चांहा हो; उस समय 'श्रावककों उसका अधिकार नहीं.' ऐसा निषेध किया गया हो और निर्माल्य ग्रहणसे अंतरायका बंधन होना बताया गया हो नहीं तो अंतरायके बंधका कारण होना किस प्रकार संभव होगा, वह सेठजीको बताना चाहिये. नियोगीका अर्थ सेठजीकी समझमें नहीं आया इसलिये हमने यह बताया है. अपने मनसे नियोग नहीं ठहरता, भरत और आदिनाथ महाराजने उन्हें और आपनेको जो कर्म करना बताया है वह उसका नियोग है.

---

# निर्माल्यद्रव्य-चर्चा.

---

( प्रगति आणि जिनविजय-मार्ग शु० १ वीर सं० २४४८, ता. ३०।११।२१. )

पुष्कळ दिवसापासून निर्माल्यद्रव्यचर्चा चालू आहे; परंतु याचा विनियोग ( उपयोग ) कसा करावा याचा निकाल अद्यापि लागलेला नाहीं. तथापि हा प्रश्न अत्यंत महत्वाचा होऊन बसला आहे. या संबंधी एक लेख पं० वंशीधर यांनीं जैनसिद्धांत मासिक वीर सं. २४४६ भाद्रपदमास अंक २ मध्यें 'निर्माल्यका विनियोग' या नांवानें प्रकाशित केला आहे. त्यातील अभिप्राय असा आहे कीं, निर्माल्यग्रहण करण्याचा हक्क फक्त उपाध्यायवर्गास आहे. कारण देवाची पूजा केल्याबद्दल श्रमाचा मोबदला ह्मणून हें द्रव्य त्यास दिलें जातें. व त्यांचें घेणें हें

त्यावास अनुसरून आहे. नियोगीशिवाय ( उपाध्यायाशिवाय ) इतरांस घेण्याचा अधिकार नाहीं. ग्रहण केलें असतां दुर्गति प्राप्त होते. पूर्वपरंपरेस अनुसरून उपाध्यायवर्ग निर्माल्य ग्रहण करीत असतां, त्यामध्यें जो कोणी विघ्न करील त्यास अंतराय कर्माचें आस्रव येतात.

पंडितजींनीं नियोगी याचा अर्थ देवसेवा करणारा उपाध्यायवर्ग असा केला आहे. तर देवाची सेवा करणारे उपाध्यायलोकच आहेत, इतर नाहींत काय? अर्थात् सर्व देवसेवा करणारे आहेत. मग सर्वांनीं निर्माल्य भक्षण करावें काय? देवसेवेचा अधिकार फक्त उपाध्यायास दिला आहे असें शास्त्रांत कोठेंहि सांपडत नाहीं व तो माहीत असल्यास पंडितजींनीं प्रसिद्ध करावा अशी त्यांना आमची सविनय सूचना आहे.

केवळ रूढीवरून देवसेवेचा मक्ता उपाध्यायास देणें कधींहि योग्य होणार नाहीं असें कोणीहि समंजस माणूस कबूल करील. कारण पूजनाचें कार्य स्वतः केल्यानें जितकी फलप्राप्ती होते तितकी दुसऱ्याच्या हातून केलेली पूजा ( भाडोत्रीपूजा ) फलदायक होत नाहीं ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे.

वास्तविक पाहता आपल्या समाजांत अज्ञान जास्त असल्यामुळें लोकांना पूजा कशी करावी व त्याचा विधि कसा आहे हें समजत नाहीं, अथवा प्रपंचामध्यें सवड होत नसल्यामुळें उपाध्यायाकडून पूजा करविण्याचा प्रघात पडला असावा असें आम्हांस वाटतें. अद्याप देखील कित्येकांस देवापुढें नीट अर्घ्यसुद्धां देतां येत नाहीं ही शोचनीय स्थिती सर्वत्र दृष्टीस पडत आहे हा प्रघात जर असाच चालू राहील तर यापेक्षां पूजनाविषयीं जास्त अज्ञान वाढण्याचा संभव आहे. याकरितां प्रत्येकानें स्वतः पूजा केली पाहिजे. कारण श्रावकांचीं सहा कर्तव्य शास्त्रांत सांगितली आहेत, त्यापैकीं जिनपूजा हें पहिलें कर्तव्य आहे व तें पाळणें अशक्य झाल्यास बाकीचीं कर्तव्यें कशीं पाळणार? याकरितां प्रत्येकानें पूजा करावयास शिकणें अत्यंत जरूर आहे अशी सर्वांस आमची नम्र

प्रार्थना आहे या योगानें उपाध्यायाचे सुद्धां श्रम वांचतील. पूजा करणाचें सामर्थ्य असणें असें काहीं दिवसांनी समाजाच्या अंगीं आल्यावर उपाध्यायाच्या पिढीजाद हक्कावर मात्र गदा येणार याची वाट काय ! याचें उत्तर असें आहे कीं, देवळांतील मूर्तिपूजा करण्याचें काम उपाध्यायांस निर्माल्या ऐवजीं पगार देऊन करून घ्यावें त्या योगानें निर्माल्य भक्षण च्या पापापासून उपाध्यायाचा बचाव होईल. पंडितजींनीं असें म्हटलें आहे कीं, 'निर्माल्य द्रव्य सर्वास त्याज्य आहे परंतु नियोगी म्हणजे पुजाऱ्यास त्याज्य नाहीं. त्याप्रमाणें सर्प सर्वांस भयंकर आहे परंतु गरुडास नाहीं.

पंडितजींनीं पुजारी लोकांस गरुडाचा दृष्टांत दिला आहे; परंतु तो येथें बरोबर लागू पडत नाहीं हें एकदां नीट विचार केला असतां सहज समजण्यासारखें आहे गरुड आणि सर्प यांचा नैसर्गिक स्वभाव अगदीं भिन्न आहे या दोघांच्या स्वभावामध्यें बदल करावा असें कोणी मनांत आणिल्यास तें होणें अशक्य कोटींतील आहे. कारण निसर्गामध्यें केव्हांहि बदल होत नाहीं असा सृष्टिशास्त्राचा नियम आहे. त्याप्रमाणें पुजाऱ्याचा पूजन करणें हा नैसर्गिक धर्म नव्हे कारण त्याचा गुण उपाध्यायाशिवाय इतराच्या अंगींदेखील असतो. देवसेवा हा गुण सर्वांस साध्य होण्यासारखा आहे जसें गरुडाचें सामर्थ्य सर्पाच्या अंगीं येत नाहीं त्याचप्रमाणें पूजनाचें सामर्थ्य दुसऱ्याच्या अंगीं येणार नाहीं म्हणूनच कीं काय उपाध्यायास निर्माल्य त्याज्य नाहीं असें विधान केलें आहे ? परंतु हे विधान कोणत्या शास्त्रांत लिहिलें आहे. याचा खुलासा पंडितजींनीं करावयाचा होता म्हणजे त्याचें म्हणणें आम्हांस पटलें असतें.

केवळ युक्तीनें कोणत्याहि गोष्टी विधानास पात्र होत नसतात, त्यास शास्त्रवचनांची आवश्यकता असते दुसऱ्यांनीं आधार दाखविला असतां तो यांना पटत नाहीं. लागलेच त्याचा विपर्यास करतात.

सोलापूर येथील सुप्रसिद्ध पुढारी गुरुवर्य शेट हिराचंद नेमचंद यांनीं 'निर्माल्यद्रव्यचर्चा' या पुस्तकामध्यें कुंदकुंदाचार्य, उमास्वामी, अकलंकदेव, अमृतचन्द्राचार्य आणि सकलकीर्ति वगैरे आचार्यांच्या शास्त्रांतील प्रमाणें दाखविलीं आहेत तीं पंडितजींना मान्य आहेत. शेवटीं त्यांनीं असें सिद्ध करून दाखविलें आहे कीं, निर्माल्य भक्षण करणें महापाप आहे. तें स्वतः खाऊं नये व दुसऱ्यास देऊं नये. कारण निर्माल्य भक्षण करणाऱ्या मनुष्यास चोरीचा दोष लागतो आणि त्यास अंतरायकर्माचे आश्रव येतात, वगच्छेद होऊन शेवटीं त्यास दुर्गति प्राप्त होते याकरितां निर्माल्यद्रव्य अग्निकुंडांत भस्म केलें पाहिजे. याचप्रमाणें पंडितजींनीं निर्माल्यद्रव्य नियोगीशिवाय इतरानीं भक्षण करूं नये अशी शास्त्राची आज्ञा दाखवून आपलें मत प्रदर्शित करावें अशी त्यांस पुन्हा एकदां नम्र विनंति करून हा लेख संपवितों.

ता. १०-१०-२१.

आपला नम्र,

माणिक गोविंद कटके, सोलापूर.

---

# निर्माल्यद्रव्य-चर्चा.

जुलाई सन १९२१ के जैन सिद्धांतमें प० वनसीधरजी लिखते हैं कि, तत्वार्थ सारका अर्थ लिखा है उसमें और इस लेखमें फरक पडा ऐसा जो आक्षेप किया है सो बराबर नहीं है लिखाने रकम और पेटेकी रकम देखनेसे फर्क नहीं है ऐसा मालुम होगा. इसका उत्तर ऐसा है कि तत्वार्थ सारके 'विघ्नकरणमतरायस्य' इसमूत्रका अर्थ अथमे इति तक कोई भी देखेगा तो मलुम होगा कि, उसमें देवसेवा करनेवाला नियोगी यदि निर्माल्यग्रहण करेगा उसको अंतराय कर्मके आस्रव नहीं होंगे ऐसा लिखाही नहीं है. ग्रहण करनेवालेको आस्रव होता है ऐसा लिखा है.

फिर भी अशुभनाम कर्मके आस्रवोंमें भी लिखा है.

चैत्यस्य च तथागन्धमाल्यधूपादि मोषणम् ॥

× × × × × +

अशुभस्येति निर्दिष्टा नाम्न आस्रव हेतवः ॥ ४७ ॥

अर्थात्ः—प्रतिमाके गंध, माला, धूप इत्यादि चीजोंकी चोरी करना वगैरह अशुभ नामकर्मके आस्रव दिखाया है.

( तत्वार्थसार अ० ६ श्लो. ४७ )

निर्माल्यद्रव्य ग्रहणको चोरी समान गिना है. सो इस मुजब—

क्षेत्रे ग्रामे खले घोषे पत्तने काननेऽध्वनि

विस्मृतं पतितं नष्टं निहितं स्थापितं स्थितम् ॥ ४९ ॥

अदत्त न परद्रव्यं स्वीकुर्वन्ति महाधिपः ॥

निर्माल्यमिव पश्यन्तः परतापविभीरवः ॥ ५० ॥

अर्थात्ः—खेतमें गांवमें खलियानमें ( खलेमें ) गौशालामें पत्तनमें ( नगरमें ) वनमें और मार्गमें भूके हुये, गिरे हुये, हराये हुये, गढे हुये, रक्खे हुये, वा स्थापन किये हुये, विना दिये हुये ( मालिककी आज्ञाके विना ) पर द्रव्यको निर्माल्यकी समान देखतहुये परतापसे भीत बुद्धिवान्पुरुष कदापि ग्रहण नहीं करते

( पं० पन्नालालजी बाकलीवालकृत—धर्मपरीक्षा उत्तरार्ध भाषे पृ० २७०।२७१ )

अब विघ्नकरणत्व हेतुके ऊपर पंडितजीका जो बहोत जोर है. उसका उत्तर हम दे चुके हैं कि,—भगवानको अर्पण किया हुवा द्रव्य निर्माल्यकूटमें डाला जाता है तबतक वह पूजाही है इस कार्यके पहिलेही जो कोई उठालेगा उसने पूजनमें विघ्न किया यह बात सिद्धही है. निर्माल्यकूटमें निर्माल्यद्रव्य डालना चाहिये यह बात पंडितजी कबूल कर चुके है. तो फिर उसके पहलेही कोई उठाले जायगा तो उसने पूजनमें विघ्न किया अथवा चोरी किई ऐसा कहनाही पडेगा. विघ्नकरणत्व हेतु

सिवाय इतर केई बातोंसे अंतरायकर्मके आस्रव होते हैं ऐसे वाक्य आचार्योंके लिखे हुवे हम बता चुके हैं उनको कैसे छोड सकोगे ? यदि नियोगी–पुजारी निर्माल्य ले जायगा तो निर्माल्यकूटमें क्या डालोगे? इस प्रश्नपर पंडितजी अभीतक निरुत्तर हैं.

पंडितजीने निर्माल्यका त्याग करनेवालेपर लोभ कषायका दोष दिया था. उसका उत्तर देते समय–लोभ कषायका दोष निर्माल्य त्याग करनेवालेपर होता नहीं निर्माल्य ग्रहण करनेवालेपर होता है ऐसा हमने लिखा है सो योग्यही है. त्यागधर्मका अर्थ लोभ कषायका अ-स्तित्व ऐसा पंडितजी करेंगे तो क्या माननाही पडेगा ?

पंडितजी लिखते हैं "हम द्रव्यपूजाके समर्थक होनेसे थोडा तो भी द्रव्यपूजामें खर्च करेंगे. परंतु शेठजी निषेधक होनेसे अग्नि-कुंडका उन्हें जन्मभरमें एक दो बारही मोका मिला होगा. इसलिये सेठजी बिल्कूलही सूखानमस्कार करनेवालोंमेंसे एक हैं." इत्यादि इसका उत्तर ऐसा है कि, हम द्रव्यपूजाके निषेधक हैं ऐसा जो पंडितजी कहते हैं सो बिल्कूल असत्य है. हमने द्रव्यपूजाका निषेध नहीं किया है, ऐसा पंडितजीके लेखपरसेही सिद्ध होता है. हमने अग्निकुंडमें एक दो बारही पूजन किया ऐसा पंडितजी लिखते है यदि अग्निकुंडमें पुजन होता है सो द्रव्यपुजनही है तो फिर द्रव्यपुजनका निषेधक अग्निकुंडमें पुजन कैसा करेगा ? इससे हमारे ऊपरका द्रव्यपूजनके 'निषेधक' नामका दोषारोप पंडितजीके वाक्योंसे ही खंडित होता है हम निर्माल्यके निषेधक है और पंडितजी निर्माल्य ग्रहणके प्रतिपादक है. पंडितजी थोडा तो भी द्रव्यपूजामें खर्च करते हैं वैसा हम भी थोडासा हररोज द्रव्यपूजामें खर्च करते है. पंडितजी दो लविंगसे अथवा तीन चापलसे द्रव्य पुजा करते होंगे. हम दो अगरबत्तीसे करते हैं. सो भी द्रव्य पुजन कहा जाता है. हम सूखानमस्कार करनेवालेमेंसे एक हैं ऐसा पंडितजी लिखते हैं. सो कोई वखत पंडितजीके खीसेमें लवंग न होनेसे पंडितजी

कू भी सूखानमस्कार करना पड़ता है वैसा हमको भी अगरबत्ती नजीक न होनेसे अथवा सजगानेकी सामग्री न होनेसे सूखानमस्कार भी करना पडता है. और ऐसा सूखानमस्कार दहोतसे श्रावक करते देखनेमें आते है इसमें कोई पाप है ऐसा पंडितजीने बतलाया भी नहीं. सूखानमस्कार करने की तो शास्त्राज्ञा—" वचो विग्रह संकोचो द्रव्य पूजा निगद्यते " इस अमितगतिश्रावकाचारसे मिलती है लेकिन द्रव्यपूजनमें द्रव्य अर्पण करके उस निर्माल्य द्रव्यको देवसेवाके बदलेमें उठालेनेको शास्त्राज्ञा जैनधर्ममें नहीं है.

पंडितजी पत्र २४ में लिखते है कि,—" अब सवाल यह हो-जाता है कि, निर्माल्य ग्रहण को यदि पाप मानें जैसा कि ग्रंथकारोंने बताया है तो उसे उक्त पाच पापोंमें गर्भित करलेना चाहिये या नहीं? धर्मशास्त्रोंका उपदेश देखनेसे पता लगता है कि पाचके सिवा छट्ठा पाप कोई नहीं है, तो फिर इसे भी किसीमें गर्भित करनाही होगा. इसीलिये हमने अपने लेखमें बतायाथा कि राजवार्तिक कारके कथनानुसार अंत-राय—विघ्नका कारण होनेसे चोरीमें इसे गर्भित करना चाहिये." इत्यादि.

इसपरसे देखना चाहिये कि पाचके सिवा छट्ठा पाप कोई नहीं है यह कैसा कह सकते? धर्मशास्त्रमें कर्मकी एकसो अडतालीस प्रकृति कही है उसमें एकसौं प्रकृति पाप बंधकी बताई है उस पाप प्रकृतियोंमें ही अंतरायकर्म है यदि पांचमेंही गर्भित करना चाहो तो भी आपने निर्माल्य ग्रहणको चोरीके पापमें गर्भित करलिया है निर्माल्यद्रव्य ग्रहण करनेमें पाप है ऐसा श्रीकुंदकुंदाचार्य. श्रीअकलंकाचार्य, श्रीअमृतचंद-सूरि, श्रीसकलकीर्ति आचार्यके ग्रथोंमें लिखा आप भी बतारहे है तो फिर सवाल काहे का? देवसेवा करनेके बदलेमें निर्माल्यद्रव्य उठाके उसको पाप नहीं है ऐसा कोई श्लोक अथवा सूत्र अथवा वार्तिक है ही नहीं. केवल आपकी कल्पना है. उसका कारण पुजारियोंका पेट कैसा भरेगा और यदि निर्माल्य उनको नहीं मिलेगा तो मंदिरजीमें पुजा

होना बंद होजायगी इस फिजूल भयसे आप उनको निर्माल्यके पापसे छुडाना चाहते है. लेकिन डरनेका कुछ काम नहीं है. उनोंने निर्माल्य ग्रहण करना छोड दिया तो उनको आजीविका पुरती तनखा मंदिरजी बनानेवाले और प्रतिष्ठा करानेवाले दे सकते है. श्रीकुंथलगिरीमें दस मंदिर हैं उनमें पूजा करनेवाले निर्माल्य नहीं लेते है. उनको तनखा मिलती हैं. वऱ्हाड, मध्यप्रात, बंगाल, उत्तर हिंदुस्थान इत्यादिमें पूजन करनेवाले निर्माल्य नहीं लेते हैं उनको तनखा मिलती है जिससे पूजनका काम बराबर चला है. सोलापूरमेंभी सेतवालके मंदिरमें भगवानका प्रक्षाल करनेवाला निर्माल्य नहीं लेता है उसको पंधरा रुपये तनखा मिलती हैं. मुख्य देवसेवा तो प्रक्षाल करनेकी है. निर्माल्य लेजानेवाला जो उपाध्याय है सो प्रक्षाल समाप्त हुयेबाद साडेनऊ बजे आता है. और एक प्रतिमा पीठमें रखकर दूधका अभिषेक करता है और दोचार अर्घ्य देता है. इतना काम तो इतर श्रावक भी करते हैं. लेकिन उपाध्याय तो निर्माल्य सब एकत्र कर गठडी बांधकर घटे देडघंटेमें चला जाता है. बडे मंदिरजीमें जब क्षुल्लक मन्नालालजी आयेथे उस वखत उनोंने निर्माल्य ग्रहण करनेवालेके हातसे पूजा नहीं करानी चाहिये ऐसा कहा, तब शेठ हिराचंद अमीचंदने अकेलेने पंधरा रुपये महावारी देना कबूल कियाथा. इससे अनुमान होता है कि पंडितजीका डर फिजूल है. जो आदमी दसबीस हजार रुपये खर्च करके मंदिर बनायगा अथवा प्रतिष्ठा करायगा उसको दस पाच रुपये महिनेका खर्चा पूजाके वास्ते क्या नहीं मिलेगा? लाखों रुपये धर्म काममें श्रावक लोक खर्च करते है तोभी पंडितजी उनके ऊपर कृपणताका ही दोषारोप रखते हैं. निर्माल्यके बदलेमें उपाध्याय वर्गको तनखा मिलेगी तो क्या वे धर्म मार्गमें लगे नहीं रहेंगे? क्या निर्माल्य खानेसेही धर्म मार्गमें आदमी लगा रहता है?

निर्माल्य खानेवालेकी भाडोत्री पूजा हो जानेसे श्रावकोंका बडा भारी नुकसान हुवा है. वऱ्हाड मध्यप्रातमें निर्माल्य भक्षकोंके हातसे

पूजा नहीं कराते आप खुद करते है जिससे उनको पूजाका पाठ सबे कंठगत है. जहां निर्माल्य भोजीके हातमे पुजा होती है वहाके श्रावकों-को 'उदकचंदन तंदुक' इतनाभी पाठ आता नहीं. उनको उपाध्याय कहता है "तुम बाहार बैठो और झागट वजाओ मै सब पुजा करलेता हों." पंडितजी कहते है भरतचक्रीने और आदिनाथ तीर्थंकरने इनको पुजा करनेको और निर्माल्य लेनेको नियत किया है. परंतु ऐसा कोई वाक्य पंडितजीने वताया नहीं. भरतचक्रीने अन्य वर्णमेंसे ब्राह्मणवर्ण बनाया सो चौथे कालके अंततक ठीक चलेगा पंचम कालमें भ्रष्ट होबा-यगा ऐसा श्रीआदिनाथ महाराजने कहा है. देखो आदि पुराण पर्व ४१ में पं. लालारामजी लिखते है.

"भरतचक्रेश्वर भगवानसे इस प्रकार निवेदन करने लगा॥ कि हे भगवन्! मैंने आपके द्वारा कहे हुये उपासकाध्याय सूत्रके अनु-सार चलनेवाले और श्रावकोंके आचरण करनेमें निपुण ऐसे ब्राह्मण निर्मापण किये हैं ॥३०॥ हे प्रभो इन्हें मैंने ग्यारह प्रतिमाओंके विभा-गसे व्रतोंके चिन्हरूप एकसे लेकर ग्यारहतक यज्ञोपवीत दिये है। हे देव! समस्त धर्मरूपी सृष्टिको साक्षात् उत्पन्न करनेवाले ऐसे आपके होते हुये भी मैंने अपनी वडी मूर्खतासे यह काम किया है ॥ ३२ ॥ हे नाथ इस ब्राह्मणोंकी रचनामें क्या दोष है और क्या गुण है तथा इनकी रचना योग्य हुई अथवा अयोग्य इस तरहके झूलेमें मेरा चित्त झूल रहा है. आप इसका निश्चयकर इस मेरे मनको स्थिर कर दीजिये।३३।

भगवान कहने लगे हे वत्स! तैने जो साधुओंके समान धर्मा-त्मा द्विजोंका पूजन किया है सो वहुतही अच्छा किया है, परंतु इसमें कुछ दोष है उसे तू सुन ॥ ४५ ॥ हे चिरजीव! तेने जो इन गृहस्थों-की रचना की है सो जवतक चौथाकाल है तवतकतो ये अपने योग्य आचरणोंका पालन करते रहेंगे ॥ ४६ ॥ परंतु जब कलियुग समीप आ-जायगा तब ये अपनी ब्राह्मण जातिके अभिमानसे अपने सदाचारसे भ्रष्ट

होकर इस श्रेष्ठ मोक्षमार्गके विरोधी बन जायंगे ॥ ४७ ॥ पंचम कालमें ये लोग " हमें सब लोगोंसे बडे हैं " इस प्रकार ब्राह्मण जातिके अभिमानसे फंसकर केवल धनकी इच्छासे मिथ्याशास्त्रोंके द्वारा सब लोगोंको मोहित करते रहेंगे ॥ ४८ ॥ " इत्यादि.

इसपरसे अनुमान होता है कि, उपाध्याय वर्ग तुवरके दालका, चनेके दालका अभिषेक करते हैं वर प्राप्तीके वहानेसे क्षेत्रपाल पद्मावति आदिके पूजनका बंड शास्त्राज्ञाविरुद्ध उन्होंनें बढाया ऐसा जैनबोधकार लिखते हैं. और एकही पीठमें अर्हतकी प्रतिमा और पद्मावतीको रखकर अभिषेक शास्त्राज्ञाविरुद्ध करते है.ऐसा पंडित जिनदास लिखते हैं. सो सब भरतचक्रीके स्वप्नोंका भविष्य श्री आदितीर्थकरने अपने दिव्यध्वनीमें बताया सो ही देखनेमें आता है.

निर्माल्यपर निर्वाह करनेवाले उपाध्याय वर्ग बडे पवित्र है उनको अपवित्र कहनेवाले मूर्ख है ऐसा पंडितजी कहते हैं. परंतु इनके पवित्रताकी योग्यता कितनी है इस विषयमें इनके श्रद्धेय भट्टारक सोमसेनने अपने त्रैवर्णिकाचारमें **देवार्चक** ( देवसेवानियोगी ) और **निर्माल्यभोजी** ये इतर पातकी समान पंक्तिभोजनत्याज्य हैं ऐसे कहा है यह ग्रंथ पं० कल्लप्पा भरमप्पा निटवेने सार्थ मराठीमें लिखा है वे पृ० ३२६। ३२७ लिखते हैं कि—

भोजनपंगतमें अयोग्य मनुष्य ये हैं—

पंक्त्ययोग्यं ततोवक्ष्ये विजातीयो दुरात्मकः ॥
मलयुक्ताम्बरोऽस्नातश्छिन्नांगः परनिन्दकः ॥ १५४ ॥
श्वासीकासी व्रणी कुष्ठी पीनसच्छर्दिरोगिणः ॥
मिथ्यादृष्टि र्विकारीच उन्मत्तः परिहासकः ॥ १५५ ॥
असंतुष्टश्च पाखण्डी लिंगी भ्रष्टः कुवादिकः ॥
सप्तव्यसनसंयुक्तो दुराचारी दुराशयः ॥१५६॥
चतुष्कषायिको दीनो निर्घृणांगोऽभिमान्यपि ॥

अतिबालोऽतिवृद्धश्चातिश्यामोऽतिमतिभ्रमः ॥ १५७॥
पण्ढश्च पश्चिमद्वारी पंचभिश्च वहिष्कृतः ॥
देवार्चकश्च निर्माल्यभोक्ता जीवविनाशकः ॥ १५८॥
राजद्रोही गुरुद्रोही पूजापीडनकारकः ॥
वाचालोऽतिमृषावादी वक्रांगश्चातिवामनः ॥१५९॥
इत्यादि दुष्टसंसर्गं सन्त्यजेत्पंक्तिभोजने ॥
श्वानसूकरचाण्डालम्लेच्छहिंसकदर्शनम् ॥१६०॥

अर्थात्—अब भोजन पंक्तीमें अग्राह्य कौन कौन है सो कहते है. अपने जातसे भिन्न मानव, दुष्ट अंतःकरणका, मलीन वस्त्र धारण करणहारा, स्नान न किया हुआ, जिसका कोई अवयव टूटगयाहो ऐसा, लोगोंकी निंदा करणहारा; श्वास, कास, व्रण, कुष्ठ, पीनस और वमन इनमेंसे कोई भी बीमारी जिसको हो गई हो, सतत बीमार हुवाहो, मिथ्यादृष्टि, निष्कारण शरीर झुकानेवाला, उन्मत्त हुवा हो, हमेशा विनोद करनेवाला, असंतुष्ट मनका, पाखण्डी, शरीरपर मुद्रा वगैरह चिन्ह धारण करनेवाला, भ्रष्ट हुवा, विसंवाद करनेवाला, सप्तव्यसनोंमेंसे कोई भी व्यसन जिसनें ग्रहण किया हो, दुराचरण करनेवाला, अपने मनमें दुष्ट भाव धारण करनेवाला, चतुष्कषाय धारण करनेवाला, दरिद्री, निर्दय, अभिमानी ऐसे मानवोंको भोजनपंगतमें न लेना चाहिये.

और ऐसेही अतिछोटा बच्चा और अति बुड्ढा मानव इनकोभी पंक्तिमें नही लेना. अतिश्यामवर्णवाला और जिसके बुद्धीको भ्रम हुवा हो ऐसा पंगतमें नहीं लेना. नपुंसक, गुदद्वारको प्रतिबंध न करनेवाला, पंचोंसे बहिष्कृत हुवाहो, सतत देवपूजाकरके अपना उदरनिर्वाह करनेवाला, निर्माल्यभक्षण करनेवाला, जीवोंका घात करनेवाला, राजद्रोह, गुरुद्रोह करनेवाला, पूजामें विघ्न करनेवाला, व्यर्थ बकवाद करनेवाला, झूठ बोलनेवाला, जिसके अवयव टेढा हो ऐसा, और अतिवामन, ऐसे मानवोंको पंगतमें नहीं लेना चाहिये.

इस परसे निर्माल्यपर आजीविका करके पूजन करनेवालोंका दर्जा कितना हलका बताया है सो विचारना चाहिये. पंक्तीभोजनमें जिसको वर्ज किया उसके हाथसे भगवानका पूजन नहि करना ऐसा श्री० ऐलक पन्नालालजी और मन्नालालजी कहते हैं सो योग्य है.

पंडितजी कहते हैं—अर्हंतकी पूजाकरके उनका विसर्जन हुये बाद अर्हंतका स्वत्व निर्माल्यपरसे हट जाता है. परंतु अर्हंत भगवानका विर्सजन होताही नहीं है, वह शासन देवताओंका होता है. ऐसे जैनबोधककार अपने जानेवारी १९२२ के अंकमें लिखते है. और इनका यह मत श्री० अप्पाशास्त्री व कल्लप्पा अनंतशास्त्री इन दोनों पंडितोंने तो जैनसिद्धांतानुसार मानलिया है. ऐसे जैनबोधक १९२२ फर्वरीके अंक पृ० २३६ मेंसे ज्ञात होता है. यदि अर्हंत भगवानका विसर्जन नहीं होता ऐसा मानें तो फिर निर्माल्यद्रव्यपर उनका स्वत्व बना रहा; और वह कोई उठा लिया तो उसने भगवानकी चोरी किई. इससे विघ्नकरणत्व हेतु सिद्ध हो चुका.

पंडितजी कहते हैं पूजाके काममें लगे हुये जैन उपाध्यायको निर्माल्य ग्रहण करनेमें दोष नहीं है. इधर श्रीयुत चवरे वकील फेब्रुवारी १९२२ के जैनबोधकमें लिखते है—" निदान परधर्मी व पूजा वगैरे न करणाऱ्या माळ्याला निर्माल्यद्रव्य घेऊं देण्यांत कांहीं दोष येतो असें वाटत नाहीं. + × + निर्माल्यद्रव्य जैन लोकानीं व पूजा करणाऱ्यांनीं कोणत्याही स्वरूपानें स्वतःचे उपयोगांत आणू नये, असा निर्बंध उत्तर हिंदुस्थानांत व मध्यप्रांतांत आहे व तो अत्यंत योग्य आहे " इत्यादि इससे ज्ञात होता है कि यदि जैन धर्मीको निर्माल्य नहीं ग्रहण करना चाहिये तो फिर अन्य धर्मी मालीको देना चाहिये ऐसा कैसा कहा जायगा ? क्या मालीकेवास्ते पाप पुण्य न्यारा है ? पापपुण्यतो सभीको एकही है. यदि माली पाप नहीं समझता हो तो उसको समझाना नहीं चाहिये ? मालीभी जैनधर्मके श्रद्धानी हो सकते हैं. उनकोभी पापसे

छुडाना चाहिये. यदि मालीभी पाप समझकर निर्माल्यलेना छोडदेगा तो क्या करोगे ? मंदिरमें अग्नीकुंड रखना अव्यव्हार्य है अशक्य है ऐसा श्रीयुत चवरे लिखते हैं. सो मंदिरजीमें हवन क्रिया होती है सो अग्निकुंड संस्कारकूट निर्माल्यकूट विना कैसी होगी ? हवन क्रियाको पंडित बनसीधरजीभी मानते हैं. पूजाके समय मंदिरजीमें तीन अग्निकुंड होना चाहिये ऐसा आदिपुराणमें लिखा है तो फिर अव्यवहार्य और अशक्य कैसा कहते हैं ? क्या इस समय मंदिरजीमें अग्निकुंड देखनेमें नहीं आता है जिससे अग्निकुड अव्यवहार्य और अशक्य होगया ? पचास बरस पहले जैनीयोंमे कोई बी. ए. बी एल देखनेमें आता नहीं था उस वखत बी. ए का पढना अव्यवहार्य समझा जाताथा. अब दरसाल जैनीयोंमें दसबीस बी ए. पास होने लगे हैं सो व्यवहार्य बात होगई ! दो बरस पहले बडे आदमी कोई खादीकी टोपी और कोट पेहेरता नहीं था उसवखत वह बात अव्यवहार्य कही जातीथी. अब हजारो आदमी पेहरते देखनेमें आते हैं. जिससे वही अव्यवहार्य बात व्यवहार्य होगई ! पचास बरस पहले कई गांवमें भगवानका रथ निकालना अथवा पालखी निकालनी अशक्य बात थी अब गांवगांवमें निकलती है सो बात शक्य होगई. वैसाही धर्मपुस्तक छपाना, बोर्डिंग खोलना, पाठशाला खोलना ये बातें अव्यवहार्यथी सो व्यवहार्य हो गई हैं. जब माली लोक निर्माल्य खाना बंद करेंगे उस वखत आप निर्माल्यको क्या करोगे ? क्या ढेड चमारोंको देंगे ? निर्माल्यको अति पवित्र मानते है उसको अत्यंत पवित्र ऐसे अग्नीकुंड अथवा निर्माल्यकूटमें रखना सोही योग्य स्थान है.

देवसेवा करनेवाले उपाध्यायने यदि पं० वंशीधरजीको निर्माल्य वस्तु—दूध केला बादाम लवंग या सुपारी आदि खानेकेवास्ते दिये तो वे अन्यमतीके माफक उस निर्माल्यको प्रसाद ( पवित्र ) मानकर भक्षण करेंगेही, कारण पंडितजीकेमतसे वह निर्माल्य वस्तु एकतो निर्मल याने पवित्र है और दुसरे यहा विघ्नकरणत्व हेतुका असंभव होनेसे पापभी नहीं लगेगा. ऐसाहि इनके "निर्माल्यविनियोग" नामक लेखसे निष्कर्ष निकलता है.

ता. ८।२।२२

हिराचंद नेमचंद सोलापूर.

# निर्माल्यद्रव्य-चर्चा.

जैनबोधक जानेवारी १९२२ च्या अंकांत कीर्तनकार चोपडेबुवा यांचा एक लेख 'निर्माल्य द्रव्य चर्चा' या मथळ्याचा आहे त्यांत श्री० चोपडेबुवा म्हणतात-"गंधोदक किती जरी प्याले तरी त्यापासून अपाय होणार नाही." परंतु घागरभर गंधोदक पिऊन पाहा भडाभड उलट्या होतात कीं नाहीं. ! तेंच घागरभर गंधोदक अंगावर ओतल्यानें कांहीं अपाय होणार नाहीं. गंधोदक प्राशन केल्यानें रोग बरे झाले असते तर तशीं उदाहरणें ग्रथात सांपडलीं असतीं.

श्रीयुत शांतारामानीं व श्री० चोपडेबुवानीं श्रीपाल राजाचें उदाहरण अंगाला गंधोदक लावण्याचें जसें दिलें तसें तें अमकयानें प्राशन केलें व त्याचा अमुक अमुक रोग बरा झाला असें उदाहरण द्यावयास पाहिजे होतें. श्री० शांतारामानीं श्री समंतभद्राचार्यांचें उदाहरण त्यानीं महादेवाच्या देवळांतील नैवेद्य खाल्याचें व त्या योगानें त्यांचा भस्मक व्याधि-रोग-बरा झाल्याचें दिलें आहे त्याबद्दल श्रीयुत कीर्तनकार चोपडे लिहितात कीं, तें उदाहरण-"शेठ हिराचंद नेमचंद यांस पटल्याचें दिसत नाहीं असें वाटतें." तेव्हां ह्यावरून तें उदाहरण कीर्तनकार चोपडे यास पटलें असावें असें अनुमान निघतें. व ज्याअर्थी महादेवाचा नैवेद्य खाल्ल्यानें श्री समंतभद्राचार्यांचा रोग नाहींसा झाला तर मग अर्हंत भगवानाचा नैवेद्य खाल्यानें श्रावकाचे आणि मुनीचे रोग बरे झालेच पाहिजेत अशी कीर्तनकार बुवाची समजूत आहे. त्याप्रमाणें त्यांनीं लोकांना उपदेश केल्यास लोक लागलीच टाळ्या वाजवितील व निर्माल्य द्रव्यावर आजारी लोकाच्या भडाभड उड्या पडतील. मग उपाध्यायाला व माळ्याला देण्याचा प्रश्नच उरणार नाहीं. चोपडे बुवानीं फार चांगला शास्त्राधार काढला !!

गंधोदक प्राशन केल्यानें रोग बरे होतात असे शास्त्राधार श्री०

चोपडे बुवांनी दाखवावयास पाहिजे होते परंतु दाखविलें नाहींत. त्याव- रून तसे आधार नाहींतच असें म्हणावें लागेल. अंगाला गंधोदक अथवा तुमती भगवंताची चरणधूलि लावल्यानें पोटांतील मोठमोठे रोग बरे होतात असे भक्तामर स्तोत्रांत म्हटलें आहे.–

उद्भूतभीषणजलोदरभारभग्ना: ॥
शोच्यांदशामुपगताश्च्युतजीविताशा: ॥
त्वत्पादपंकजरजोऽमृतदिग्धदेहा ॥
मर्त्या भवन्ति मकरध्वजतुल्यरूपा: ॥ ४५ ॥

अर्थः—ज्यास भयंकर जलोदर झालें आहे, व त्याच्या भारानें जे केवळ भग्न झाले आहेत, आणि त्यामुळें शोचनीय अवस्थेप्रत प्राप्त होऊन ज्यांनीं आपल्या जीवाची आशा सोडली आहे, असेहि कोणी असले तरी, त्यांच्या शरीरास तुझ्या चरण कमळांची धूळी हेंच कोणी अमृत, त्या अमृतानें माखिलें असतां, ते मदनासारखे सुंदर होतात. ( पं० कलप्पा भरमप्पा निटवे कृत–सार्थ भक्तामर. )

ह्यात ' दिग्धदेहा ' असें पद आहे त्याचा अर्थ शरीराला माखणें, लावणें, चोपडणें असाच होतो. तोंडानें प्राशन करणें असा होत नाहीं. व जलोदर हा पोटांतील रोग आहे. तो बरा करण्यासाठीं प्राशन न करतां नुसते अंगास लावल्यानें बरा कसा होईल हा चोपडे बुवांचा तर्क आहे. परंतु जिनवाणीची आज्ञा अंगाला लावण्याची आहे. इकडे चोपडेबुवानीं लक्ष द्यावें. कारण येथें श्रीमानतुंगाचार्यांनीं भगवंताच्या चरणरजास सर्वोत्कृष्ट पेय पदार्थाचें ( अमृताचें ) जरी रूपक दिलें आहे तरी त्यांनीं पोटांतील रोगावर सुद्धा तें प्राशन करण्याविषयीं न सांगतां मुद्दाम अंगास लावण्यासच सांगितलें आहे. याचें कारण तरी हेंच कीं- निर्माल्य हें कोणत्याहि प्रसंगीं कोणाच्याच भक्षण करण्यांत येऊं नये ही जिनाज्ञा चालविण्याविषयीं आचार्यांनीं घेतलेली पूर्ण खबरदारीच होय. असें या- वरून स्पष्ट सिद्ध होत आहे.

यावरून पोटांतील रोगशमनार्थ तें गंधोदक वगैरे (निर्माल्य) भक्षण केलेंच पाहिजे असें जें चोपडे बुवांचें ह्मणणें आहे तें निराधार आहे असें ठरतें.

अंगाला लावणें तसेंच नाकानें फुलाचा वास घेणें आणि, तोंडानें नैवेद्य भक्षण करणें हें सगळें चोपडेबुवा ह्मणतात—"माझ्या मतानें इंद्रियांच्या धर्माप्रमाणें देवाच्या वस्तु सेवन करण्यांत पापपुण्य सारखेंच वाटलें जाईल." तेव्हां हें एक मोठेंच कोडें त्यांनी पुढें मांडलें आहे. परंतु हें कोडें त्यांच्याच लेखांतील एका वाक्यानें सहज उलगडलें जात आहे. पहा, पत्र २०१ मध्यें चोपडेबुवा लिहितात कीं, "ज्यानें परमेश्वरापुढें जी वस्तु ठेवली ती पुनः त्यानेंच घेऊं नये आणि याला शेटजींनी निर्माल्य खाणारा यांस काय फळ मिळतें याचा श्लोकाधार दिला आहे तोच श्लोक आमच्या वरील अनुमानाला आधार भूत झाला आहे."

"पुत्तकळत्तविहीणो दारिद्दो पंगुमूक वहिरंधो ॥
चांडालाइकुजादो पूजादाणाइ दव्वहरो ॥"

"अर्थः—पूजा, दान, इत्यादिकांचें द्रव्य जो घेतो तो पुत्रविहीन स्त्रीविहीन, पांगळा, मुका, आंधळा असा होऊन नीच कुळांत जन्म घेतो." (श्रीरयणसार—कुंदकुंदाचार्य.)

ह्यांत "ज्यानें परमेश्वरापुढें जी वस्तु ठेवली ती पुनः त्यानें घेऊं नये." असें जे चोपडे बुवांचें ह्मणणें आहे तेंच ह्या कोड्याचें उत्तर आहे. कारण कां घेऊं नये असा प्रश्न केल्यास घेतल्यानें पाप लागतें असें कुंदकुंदाचार्यांनी सांगितलें आहे "तें वचन प्रमाण आहे त्याच्यावर पूर्ण भरंवसा ठेवला पाहिजे" असें चोपडे बुवाच ह्मणतात. तेव्हां त्यानींच प्रश्नाचें उत्तर दिलें असून दुसऱ्याना काय ह्मणून विचारतात? कडेवर मूल असून गावभर हुडकती माझें मूल कोठें गेलें? ह्या नमुन्याचा चोपडे बुवाचा हा प्रश्न आहे!

पुढें चोपडेबुवा लिहितात—"पण वरील श्लोकाप्रमाणें उपाध्याय वर्गावर कोणताच परिणाम झालेला दिसत नाहीं. श्लोकांत झटकें आहे

की, निर्माल्य भक्षकाचा जन्म नीच कुळांत होतो पण उपाध्यायचें कुळ नीच आहे असें कोणीच ह्मणणार नाहीं." वगैरे. ह्यावरून चोपडे बुवांची अशी समजून दिसते की, नीच कुळांत जन्म होण्यासाठीं जें गोत्रकर्म बांधावें लागतें तें निर्माल्य खाणें सुरू करण्याच्या आधींच पूर्व जन्मीं बांधावें लागतें. कारण उपाध्याय वर्ग निर्माल्य खातो तो ह्या जन्मीं. तेंव्हां त्याचें फळ ह्मणजे कूळ पूर्वजन्मीं कसें बांधालें गेलें ?

ह्या जन्मीच्या पापपुण्याचें फळ ह्या जन्मीं नाहीं मिळालें तर पुढच्या जन्मीं मिळेल. परंतु उलटें मागच्या जन्मीं तें कसें जाईल ? ह्मणून उपाध्यायवर्गाचें ह्या जन्मांतील कूळ जें आहे तें मागच्या जन्माचें बांधलेलें आहे. ह्या जन्माचें कूळ कसलें बांधलें जाईल तें पुढच्या जन्मीं समजेल. तेंव्हां चोपडेबुवांनी उपाध्यायांच्या हल्लींच्या कुळाचा चांगलेपणा जो वर्णन केला तो काय उपयोगाचा ? तसेंच "उपाध्यायवर्ग अनादिकाळापासून निर्माल्य खात आला आहे, मग सारेच अंध पंगू झाले असते. स्त्रीविहीन झाले ह्मणावें तर सर्वांच्या बायका आहेत त्याकरितां वरील श्लोकाधारें असेंच ठरतें कीं, जे श्रीमंत आहेत त्यांना हें वरील आचार्यांचें वचन लागूं आहे ह्मणजे त्यांनीं एकदां जी वस्तु किंवा जें धन देवार्पण केलें किंवा देवाच्या नावानें काढून ठेवलें तर त्यांनीं तें पुनः परत घेऊं नये वगैरे ह्यावरून श्रीमतांनीं मात्र निर्माल्य खाऊं नये गरीबांनीं खाल्ल्यास त्यांना पाप लागणार नाहीं असें कीर्तनकाराचें ह्मणणें आहे. ह्मणजे गरीबाला इन्कमटॅक्स लागत नाहीं ह्मणून त्यांना निर्माल्याचेंही पाप लागत नसावें कीं काय ? बरें, निर्माल्य खाणारे उपाध्ये अंध, पंगु, स्त्रीविहीन झालेले दिसत नाहींत असें चोपडेबुवा लिहितात तर मग श्रीमंत लोक जे निर्माल्य खातात व देवाचें धन हरण करतात. त्यांतील तरी किती जण अंध, पंगु, स्त्रीविहीन असे चोपडे बुवांच्या दृष्टीस पडले ह्मणून श्रीमतांनीं निर्माल्य खाऊं नये असा अभिप्राय त्यांनीं दिला ? जेथें प्रत्यक्ष प्रमाण सांपडत असेल तेथें आगमप्रमाण मान्य करण्याची जरूरी नाहीं असें चोपडेबुवांचें ह्मणणें दिसतें. व जरी आगमप्रमाणाविषयीं

ते लिहितात कीं, कुंदकुंदाचार्यांच्या श्लोकावर भरंवसा ठेवला पाहिजे तरी त्याचा निर्माल्य खाण्याचा जो दोष आहे त्याचा अर्थ तरी निराळा करावा.' असें ते पत्र २०२ मध्यें लिहितात. त्यांनीं 'पुत्तकलत्तविहीणो' या गाथेचा अर्थ देतांना 'दारिद्दो' 'बहिरांधळाई' ह्या शब्दाचा अर्थ गाळून टाकला आहे. शेठजींच्या 'निर्माल्यद्रव्यचर्चा' नामक पुस्तकांतील पान ५ वरून चोपडेबुवांनीं ही गाथा घेतली असें म्हटलें आहे तर त्या पांचव्या पानांत गाथेच्या खालीं दारिद्दो वगैरे शब्दांचा अर्थ दिलेला आहे तो येथें कां गाळला हें समजत नाहीं कदाचित गरीबी आणि दारिद्र्य हे सारखेच शब्द असल्यामुळें निर्माल्य खाण्यानें दारिद्र्य येतें असें दिसल्यास गरीबांला निर्माल्य खाण्यास मोकळीक राहणार नाहीं. ह्यावरून श्रीकुंदकुंदाचार्यांच्या गाथेचा अर्थ बदलण्याकडे चोपडे बुवांचा रोख दिसतो. गरीबांना निर्माल्य खाण्याचें पाप लागूं नये असा अर्थ झाल्यास त्यांना पाहिजे आहे. तसेंच उपाध्याय वर्गालाही निर्माल्य खाण्यापासून पाप लागूं नये असा अर्थ " देवतानिवेद्यानिवेद्यग्रहणं " ह्या राजवार्तिकांतील वार्तिकाचा करावा अशी त्यांची इच्छा आहे. ते म्हणतात, " अर्थात् जो धनिक श्रावक देवासाठीं रक्कम अर्पण करतो किंवा करण्यासाठीं काढून ठेऊन पुन्हां त्यांत मन दाखवितो त्याला अंतराय कर्माचे आस्रव होतील. उपाध्याय वर्गाचा यांत कांहींच संबंध येत नाहीं." " हें वाक्य उपाध्याय वर्गासाठीं आहे कां धनिक श्रावकांसाठीं आहे याचा विचार वाचकच करोत. " असें जें म्हटलें आहे त्याचा आशय कसे तरी करून गरीबांला अथवा उपाध्याय लोकांना निर्माल्य खाण्यानें पाप लागूं नये असा अर्थ राजवार्तिकांतील वार्तिकाचा व कुंदकुंदाचार्यांच्या गाथेचा केल्यास बरें होईल अशी चोपडे बुवांची इच्छा आहे. परंतु ती पार पाडणें मात्र वाचकांच्या मर्जीवर आहे.

श्रीकुंदकुंदाचार्यांच्या गाथेचा व राजवार्तिक काराच्या वार्तिकाचा अर्थ फिरविण्याची इच्छा न ठेवतां सरळ अर्थ जसाचा तसा घेण्याचें चोपडेबुवानीं मनांत आणल्यास व श्रीकुंदकुंदाचार्यांची 'जिण्णुद्धार पइट्ठा

नांवची त्याच पांचव्या पानांतील गाथा डोळ्यापुढें ठेवल्यास नाकानें वास घेणें, कानानें भजन ऐकणें, अंगाला गंधोदक लावणें नदीचें पाणी फुकट पिणें, महाबळेश्वराची हवा फुकट खाणें वगैरेपासून निर्माल्याच्या दोषाचें तर्कशास्त्र उर्फ नुक्तेचेनी लढवीत बसण्याची जरूरी राहात नाहीं. त्यांनी फक्त भक्षण करण्यापासून व अपहार करण्यापासूनच महान पाप घडतें असेंच सांगितलें आहे. पहा " जो भुजइ सो भुजइ जिणुद्दिठ णिरयगइ दुक्ख ॥३१॥" ह्मणजे जिनमंदिरादिकांचा जीर्णोद्धार, प्रतिष्ठा, जिनपूजा, तीर्थवंदना ह्या संबंधाचें द्रव्य जो भक्षण करतो तो नरकगतीचें दुःख भोगतो, असें जिनेश्वरानीं सांगितलें आहे." ह्मणून ह्म-टलें आहे. नाकानें वास घेण्यापासून अथवा अंगाला गंधोदक लावल्यापा-सून पाप घडत असतें तर त्यानीं तसें सांगितलें असतें. आचार्यांच्या वाक्यावर भरंवसा ठेवला पाहिजे असें तर ह्मणावयाचें परंतु त्यांतून निसटण्या-साठीं एखादी पळवाट काढण्याचाही प्रयत्न करायाचा. ही गंमत आहे!

श्रीयुत चोपडेबुवानीं कबूल केलें आहे कीं, जी वस्तु परमेश्वरा-पुढें अर्पण केली ती वस्तु त्यानें पुनः घेऊं नये असें जर आहे तर मग ती वस्तु त्यानें दुसऱ्यास देता कशी येईल? आपण घेणें काय आणि घेऊन दुसऱ्याला देणें काय सारखेंच आहे. "न हरति यन्न च दत्ते तदकृशचौर्यादुपारमण ॥" हें जें समंतभद्रस्वामीचें अचौर्य अणुव्रताचें लक्षण आहे त्याप्रमाणें पाहिलें ह्मणजे आपण अदत्तादान घेऊं नये व तें घेऊन दुसऱ्यालाहि देऊं नये. कृत कारित हें सारखेंच जैनधर्मांत मानलें आहे.

श्रीयुत चोपडेबुवा अग्निकुंडात पूजन करण्याच्या संबंधानें व निर्माल्यद्रव्य जाळण्याच्या संबंधानें अडचण दाखवितात कीं, नारळ, फळें, नैवेद्य, अक्षत, हीं अर्पण केलेलीं जाळतां येतील, परंतु दोन हात आणि तिसरें मस्तक अर्पण केलेलें त्याचें काय करणार? तेव्हां हें ही एक मोठेंच कोडें श्रीयुत बुवानीं पुढें टाकलें आहे. परंतु याचें उत्तर एकाच 'अर्पण' शब्दांत आहे अर्पण करावयाचे जे पदार्थ असतात

ते पुन्हां घ्यावयाचे नाहींत ही गोष्ट श्रीयुत चोपडेबुवा कबूल करून चुकले आहेतच व त्याप्रमाणें अक्षत, नैवेद्य, फळ वगैरे देवाला अर्पण केलेले अग्निकुंडांत भस्म होऊन जातात व जाळूनही टाकतां येतात यांत श्रीयुत बुवाना अडचण वाटत नाहीं. अडचण काय ती फक्त दोन हात आणि तिसरें मस्तक अर्पण करणाऱ्याची राहिली तेव्हां येथें श्रीयुत बुवांना असा प्रश्न करता येईल कीं, अर्पण ह्या शब्दाचा अर्थ आपण काय करता? दाखवून परत घेणें असा अर्थ करता कां जसें खिशांतून बदाम काढून किंवा तबकडात नैवेद्य ठेवून तो देवा पुढें ठेवता तसा त्याचा सर्वस्वी वियोगपर क्रिया करण्याचा अर्थ करतां? दाखवून परत घेणें असा अर्पण शब्दाचा अर्थ कोणीहि करणार नाहीं. कारण अशा क्रियेला फसवणूक ह्मणतात. तेव्हां अर्पण ह्मणजे त्या पदार्थाचा सर्वस्वी त्याग करणें असाच अर्थ ग्रंथकारानीं केलेला आहे. त्याप्रमाणें दोन हात आणि तिसरें मस्तक अर्पण करणाऱ्यानें ते तिन्ही अवयव आपल्या धडापासून वेगळे करूनच देवापुढें ठेवावे लागतील तेव्हांच त्याला अर्पण केलें असें ह्मणता येईल व असें ज्यावेळीं वेगळे करून देवापुढें ठेवाल त्याच वेळीं त्याला कोणीहि उपाध्याय अथवा गरीब मनुष्य घेण्यासाठी पुढें न येतां त्या अवयवाना लवकर जाळून टाका असेंच ह्मणेल. इतकेंच नाही तर बाकीचें उरलेलें रक्तबंबाळ झालेलें धडही देवळातून लवकर काढून टाका व जाळून टाका असेंच उपाध्याय लोक ह्मणतील. तेव्हां श्रीयुत बोवाच्या कोड्याचें उत्तर त्याच्या एका अर्पण शब्दामध्येंच आहे कीं नाहीं? पहा विचार करा, देवाला हात व मस्तक कोणी अर्पण करीत नसतो. हात जोडतो व मस्तक नमवितो. मस्तक अर्पण करण्याचे शब्द अन्यमती लोकात वापरले जातात व त्यांतून एखादा आपलें मस्तक कापून देवाला अर्पण करतो. परंतु जैन तसें करीत नाहींत. असली आत्महत्येची भक्ति करणें महान पाप आहे असें जैन समजतो.

उपाध्याय वर्गाचें कूळ फार उंच असल्याबद्दल श्री० चोपडेबुवा

लिहितात. पत्र २०२ मध्यें ते लिहितात कीं,—" आज जैनांमध्यें सर्व क्रिया विधियुक्त म्हणजे संध्या, मौंजीबंधन, पूजा अर्चा, यज्ञोपवीत धारण करणें, पुनर्विवाह विरोधी, सोंवळें शुचिर्भूतपणा इत्यादि सर्व गुण जैनांमध्यें बहुतेक यांच्या इतके दुसरे ठिकाणी मिळणें कठीण पडेल. + + उपाध्यायाचें कुल नीच आहे असें कोणीच म्हणणार नाहीं." वगैरे वगैरे.

आतां ज्या त्रैवर्णिकाचारग्रंथाच्या आधारानें उपाध्यायलोक सदरील सर्व क्रिया करीत असतात त्याच ग्रंथांत सांगितलेल्या पंक्तीभोजनाला घेण्यास अयोग्य माणसांमध्येंच उपाध्यायाची गणना केली आहे. पहा.—

पंक्तीला घेण्याला अयोग्य मनुष्यें—

पंक्त्ययोग्यं ततोवक्ष्ये विजातीयो दुरात्मकः ॥
मलयुक्ताम्बरोऽस्नातश्छिन्नांगः परिनिन्दकः ॥ १५४ ॥
श्वासी कासी व्रणी कुष्ठी पीनसच्छार्दिरोगिणः ॥
मिथ्यादृष्टिर्विकारीच उन्मत्तः परिहासकः ॥ १५५ ॥
असंतुष्टश्च पाखण्डी लिंगीभ्रष्टः कुवादिकः ॥
सप्तव्यसनसंयुक्तो दुराचारो दुराशयः ॥ १५६ ॥
चतुष्कषायिको दीनो निर्घृणांगोऽभिमान्यपि ॥
अतिबालोऽति वृद्धश्चातिश्यामोऽतिमतिभ्रमः ॥ १५७ ॥
षण्ढश्च पश्चिमद्वारी पश्चाभिश्चबहिष्कृतः ॥
देवार्चकश्च निर्माल्यभोक्ता जीवविनाशकः१५८
राजद्रोही गुरुद्रोही पूजापीडनकाकरः ॥
वाचालोऽतिमृषावादी वक्रांगश्चातिवामनः ॥ १५९ ॥
इत्यादिदुष्टसंसर्गं सन्त्यजेत्पंक्तिभोजने ॥
श्वानसूकरचाण्डालम्लेंच्छहिंसकदर्शनम् ॥ १६० ॥

( सोमसेनकृत त्रैवर्णिकाचार सार्थ पृ. ३२६ )

या श्लोकांचा अर्थ पं. कलप्पा निटवे यानीं केला आहे तो असा—

अर्थः—आतां पंक्तीस घेण्याला अयोग्य कोण कोण आहेत तें सांगतात—आपल्या जातीहून निरानिराळ्या जातीचा मनुष्य, दुष्टमनाचा,

मळकट वस्त्र अंगावर घेणारा, स्नान न केलेला, ज्याचा कोणता तरी अवयव तुटलेला आहे असा, लोकाची निंदा करणारा, श्वास, खोकला, व्रण, कुष्ट, पेनसी आणि ओकारी ह्यांपैकीं कोणताहि रोग ज्याला असेल तो, नेहमीं रोगी असलेला, मिथ्यादृष्टि, उगीच अंगहलविणारा, उन्मत्त झालेला, नेहमीं थट्टा करणारा, असंतुष्ट मनाचा, पाखण्डी, अंगावर मुद्रा वगैरे चिन्हें धारण करणारा, भ्रष्ट झालेला, दुष्टवाद करणारा, सात प्रकारच्या व्यसनापैकीं कोणतेंहि एखादें व्यसन ज्याला आहे असा, दुराचार करणारा, मनांत दुष्टभाव धरणारा, चार कषाय ज्याला आहेत असा, दरिद्री, निर्दय, अभिमानी अशा मनुष्याना पंक्तीस घेऊं नये. अगदीं ल्हान मूल आणि अतिशय वृद्ध मनुष्य ह्याना पंक्तीस घेऊं नये. अतिशय काळा असलेला मनुष्य, ज्याच्या बुद्धीला भ्रम झाला आहे असा मनुष्य पंक्तीस घेऊं नये. नपुंसक, गुदद्वाराला प्रतिबंध नसलेला, पंचांनीं ज्याला बहिष्कृत केलें आहे असा, नेहमीं देवपूजा करून उदरनिर्वाह करणारा, निर्माल्य खाणारा, जीवाचा घात करणारा, राजद्रोह गुरुद्रोह करणारा, पूजेला विघ्न करणारा, उगींच बडबडणारा, खोटें बोलणारा, ज्याचे अवयव वांकडे आहेत असा, आणि फारच गिड्डा असलेला, अशा मनुष्याना पंक्तीस घेऊं नये. भोजनाचे वेळीं कुत्रें डुक्कर, चाण्डाल, म्लेंच्छ आणि हिंसा करणारे ह्याचें दर्शन करूं नये.

ह्यावरून उपाध्यायाच्या कुळाचा विचार करतांना हे श्लोकही विचारांत घ्यावेत अशी आमची सूचना आहे.

सोलापूर, ता. २०।२।२२. } बापूचंद जेठीराम सोलापूर.

---

## निर्माल्यद्रव्यावर अनेकांच्या वेगवेगळया उड्या.

निर्माल्यद्रव्य देवसेवा करणाऱ्या पुजाऱ्यांनीं घ्यावें असें पं० बनसीधरजी म्हणतात. श्रीयुत नत्रे वकील ह्मणतात कीं,— तें जैनांला

देण्यांत पाप आहे अजैन असलेल्या माळ्याला द्यावें. श्रीयुत कीर्तनकार चोपडे बुवा म्हणतात. निर्माल्य खाल्ल्यानें पोटांतील रोग बरे होतील. परंतु तें श्रीमंतानीं खाऊं नये गरीबानें व उपाध्यायानें खावें त्याप्रमाणें निर्माल्यद्रव्यावर अनेकांच्या वेगवेगळया उड्या दिसतात. त्यावरून एक दृष्टांत आठवतो तो असा– एका स्वरूपवान वेश्येचें प्रेत स्मशानांत आणलें होतें तेथें एक कुत्रें, एक कामी पुरुष आणि एक धार्मिक मनुष्य असे उभे होते कुत्र्यानें त्या प्रेताकडे पाहून मनांत म्हटलें की, हें प्रेत मला खावयास मिळालें तर माझी भूक शमून मला आनंद होईल. कामी पुरुष म्हणाला कीं, अशी स्वरूपवान स्त्री भोगण्यास मिळाली तर केवढी बहार होईल तो धार्मिक मनुष्य म्हणाला कीं, असें उत्तम शरीर ह्या स्त्रीला मिळालें असून तिनें त्याचा तपश्चरणादि सत्कार्यांत उपयोग न करिता तें व्यर्थ घालविलें, जाळून टाका. अशा तऱ्हेनें आपआपल्या कल्पनेंप्रमाणें त्यानीं वेगवेगळे अभिप्राय दिले. तसेंच हल्लींही निर्माल्यद्रव्य कोणाला तरी देऊन बदला त्याच्याकडून देवाच्या पूजेची अथवा देवळांतील झाडलोट करण्याची कामगिरी करून घ्यावी, निदान रोग बरे करण्यासाठीं औषध म्हणून त्याचा उपयोग करावा अशा सूचना होत आहेत. अशा कल्पना सुचण्याचें कारण अन्यमती लोकांत निर्माल्यद्रव्य खाण्यात पाप कांहीं मानीत नसून तें प्रसाद म्हणून खाण्यांत येतें. तर मग जैनानींच तें खाण्यांत पाप कशासाठीं मानावें ? असा समज बहुसंख्येच्या सहवासानें होणें साहजिक आहे. परंतु जैनानीं लक्षात ठेवावें कीं, जैनाचार्यांनीं निर्माल्य ग्रहण करण्याचें फार पातक सांगितल्यामुळेंच जैनांनीं देवळें व्यवस्थापकांच्या मालकीचीं झालीं नाहींत व बडवे, सेवाधारी, पुजारी वगैरे सारखे देवळांचे ठटेबखेडेहि कोर्टांत गेले नाहींत.

सोलापूर
ता० २८।१।२२

आपला,
शंकर पंढरीनाथ रणदिवे.

| | किं. रु. | आ. |
|---|---|---|
| श्रीसमंत भद्रा० चरित्र | ० | ४ |
| विधवा विवाह खंडन.... | ० | ४ |
| प्रतिमा पूजन .... | ० | ४ |
| जैनधर्माचें प्राचीनत्व .... | ० | ८ |
| जैनधर्माचा प्राचीन इतिहास | १ | ४ |
| धर्मपरीक्षा मराठी .... | १ | ८ |
| स्वयंभूस्तोत्र सार्थ .... | २ | ८ |
| पापपुण्याचीं कारणें .... | ० | १ |
| अशौचनिर्णय चर्चा .... | ० | ४ |
| शासनदेवतापूजन चर्चा | ० | ४ |
| सुभाषितावली ... | १ | ४ |

**हिंदी भाषाके ग्रंथ**

| | | |
|---|---|---|
| भगवती आराधना .... | ४ | ० |
| ज्ञानार्णव .... | ४ | ० |
| गोम्मटसार कर्मकांड .... | २ | ० |
| पद्मपुराण .... | ६ | ० |
| हरिवंशपुराण .... | ५ | ० |
| पाण्डवपुराण .... | २ | १२ |
| तेहरद्वीपविधान ... | २ | १२ |
| आत्मख्याति समयसार | ४ | ० |
| सर्वार्थसिद्धि .... | ४ | ० |
| स्याद्वादमंजरी .... | ४ | ० |
| प्रद्युम्नचरित्र .... | २ | १२ |
| समयसार नाटक .... | २ | ८ |
| श्रावकधर्मसंग्रह .... | २ | ४ |
| प्रवचनसार परमागम | ३ | ० |
| धर्मसंग्रह श्रावकाचार .... | २ | ० |
| मोक्षमार्ग प्रकाश .... | १ | १२ |
| श्रेणिक चरित्र .... | १ | १२ |
| भक्तामरकथा यंत्रमंत्रकी | १ | ४ |
| पुरुषार्थ सिद्ध्युपाय .... | १ | ४ |
| स्वामिकार्तिकेयानुप्रेक्षा | १ | ८ |
| चरचा शतक .... | ० | १२ |

| | किं. रु. | आ. |
|---|---|---|
| चोवीस तीर्थंकरपूजा .... | ० | १२ |
| भाषापूजा संग्रह .... | ० | ८ |
| नित्यनेम पूजा .... | ० | ४ |
| द्रव्यसंग्रह .... | ० | ४ |
| रत्नकरंड .... | ० | ४ |
| जैनपद संग्रह भाग १. | ० | ४ |
| जैनपदसंग्रह भाग २.... | ० | ४ |
| ,, ,, ३.... | ० | ४ |
| ,, ,, ४.... | ० | ८ |
| भूधर जैनशतक ... | ० | १० |
| क्रियाकोश .... | १ | ८ |
| हिराचंद अमोलिकचीं पदें | ० | ९ |
| दर्शनकथा छंदबंदी .... | ० | ६ |
| अकलंकस्तोत्र .... | ० | ३ |
| जिनशतक हिं. अर्थ. .... | ० | १२ |
| वृंदावन पूजा .... | ० | १२ |
| पार्श्वनाथ चरित्र छंदबंदी | १ | ७ |
| भाषापूजा .... | ० | ८ |
| चोवीसठाण चर्चा ... | ० | ६ |
| बृहद्द्रव्यसंग्रह .... | २ | ० |
| सिद्धांतप्रवेशिका .... | ० | ३ |
| मृत्युमहोत्सव ... | ० | ३ |
| यशोधर चरित्र हिं. अर्थ .... | २ | ० |
| नरकाचित्रादर्श .... | ० | १० |
| नित्यपाठसंग्रह हिंदी .... | ० | ८ |
| रत्नकरंड श्रावकाचार ... | ४ | ० |
| बनारसिविलास छंद .... | १ | ८ |
| शिखरजी महात्म्य .... | ० | १ |
| आलोचना सामायिक .... | ० | १ |
| छहढाला .... | ० | १ |
| निर्वाणकांड .... | ० | १ |
| पंचकल्याणिक रूपचंदकृत | ० | १ |
| धर्मविलास .... | ० | ६ |

| | कि. रु. | आ. |
|---|---|---|
| स्याद्वाद मंजरी | ... ४ | ० |
| जैनशतक | .... ० | ३ |
| जैनसिद्धांत संग्रह | .... २ | ८ |
| षट्पाहुड | .... १ | ० |
| उपमिति भवप्रपञ्च | .... १ | ० |
| धर्मपरीक्षा | ... १ | ० |
| भद्रबाहुचरित्र | .... १ | ० |
| ज्ञानसूर्योदय नाटक | ... ० | ० |
| अंजना सुंदरी नाटक | .... ० | ८ |
| समाधिमरण | .... ० | १ |
| श्रावकवनिताबोधिनी | .... ० | ६ |
| नागकुमार चरित्र | .... ० | ६ |
| प्रद्युम्न चरित्र | .... ० | ८ |
| सृष्टिकर्तृत्वमीमांसा | .... ० | १ |
| आराधनाकथासार कोश | २ | ८ |
| स्वानुभवदर्पण | .... ० | ४ |
| अनुभव प्रकाश | .... ० | ६ |
| भट्टारक-चर्चा | .... ० | १ |
| सार्वधर्म | ... ० | १ |
| सप्ततत्त्व विचार | .... ० | १ |
| जैनधर्माचें सौंदर्य | .... ० | ०॥ |
| जैनधर्माची माहिती | .... ० | २ |
| जैनार्णव | .... १ | ४ |
| धर्मप्रश्नोत्तर | .... २ | ० |

## संस्कृत पुस्तकें.

| | | |
|---|---|---|
| कातंत्र व्याकरण | .... १ | ० |
| दशलाक्षणिक पुजा | ... ० | १० |
| जैनकथाद्वाविंशति | .... ० | २ |
| प्रमेयकमलमार्तंड | ... ४ | ० |
| आत्ममीमांसा समंतभद्राचार्य कृत | ... ३ | ० |

| | कि. रु. | आ. |
|---|---|---|
| आप्तपरीक्षा | .... १ | ० |
| समयप्राभृत कुंदकुंदाचार्यकृत | .... १ | ४ |
| समयप्राभृत द्वितीयखंड | १ | ४ |
| समयप्राभृत चतुर्थखंड | .... १ | ४ |
| धर्मरत्नोद्योत | .... १ | ० |
| अलंकार चिंतामणी | .... ० | १२ |
| देवशास्त्रगुरुपूजा | .... ० | ४ |
| पंचस्तोत्र मूळ | .... ० | २ |
| नित्यपाठ संग्रह | .... ० | ६ |
| नंदीश्वर भक्ति | .... ० | ३ |
| सनातन जैनग्रंथमाला | .... १ | १ |
| पंचाध्यायी | .... ० | १२ |
| पार्श्वाभ्युदय काव्य | .... ० | १२ |
| गोम्मटसार मूळगाथा | .... ० | ६ |
| परीक्षामुख | .... ० | १२ |
| विश्वलोचन कोश | .... १ | ८ |
| भक्तामरमूळ | .... ० | १ |
| न्यायदीपिका | .... ० | १२ |
| जैनप्रक्रिया संग्रह | .... ० | १२ |
| सागारधर्मामृत | .... ३ | ० |
| राजवार्तिक.... | .... ९ | ० |

## गुजराथी पुस्तकें.

| | | |
|---|---|---|
| क्षमाविधी | .... ० | २ |
| सुकुमाळ चरित्र | .... ० | ८ |
| सल्लेखना मृत्युमहोत्सव | .... ० | ४ |
| अनित्यपंचाशत् | .... ० | २ |
| जैनीझम इन्ट्रोडक्शन इ.. | ० | ८ |